राज्यातील शासकीय गोदाम दुरुस्तीच्या कामासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत, शेगाव बु. शासकीय धान्य गोदाम, ता. वरोरा, जिल्हा - चंद्रपूर. (सन २०१८-१९)

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः गोदादु-१११६/प्र.क्र.१३२३/नापु-१६-ब**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: ११ जुलै, २०१८

**वाचा-**

१. जिल्हा पुरवठा अधिकारी, चंद्रपूर यांचे पत्र क्र.पुवि/कक्ष-१३/अ.ली.प्रपत्र/२०१७/३२९, दि.०७/०९/२०१७.
२. जिल्हा पुरवठा अधिकारी, चंद्रपूर यांचे पत्र क्रमांक पुवि/कक्ष-१३/अ.का.प्रपत्र/कावि-९३/२०१८, दि.०७/०५/२०१८.

**प्रस्तावना-**

सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत राज्यातील शिधापत्रिका धारकांना जीवनावश्यक वस्तूंचे वितरण करण्यात येते. भारतीय अन्न महामंडळाकडून प्राप्त होणाऱ्या अन्नधान्याची साठवणूक राज्य शासनाच्या गोदामामध्ये केली जाते. चंद्रपूर जिल्हयातील शेगाव बु. शासकीय धान्य गोदाम, ता.वरोरा येथील गोदामाच्या दुरूस्तीचे अंदाजपत्रक जिल्हा पुरवठा अधिकारी, चंद्रपूर यांच्याकडून शासनास प्राप्त झाले आहे. सदर शेगाव बु. शासकीय धान्य गोदाम, ता.वरोरा, जि.चंद्रपूर गोदामाच्या दुरूस्तीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती

**शासन निर्णय-**

२. चंद्रपूर जिल्हयातील शेगाव बु. शासकीय धान्य गोदाम, ता.वरोरा येथील दुरूस्तींच्या कामास व अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधीनतेने प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

I. गोदामाचा नकाशा, संकल्पन व साईट प्लॅन सक्षम अधिकाऱ्यांकडून मंजूर करुन घेतल्याशिवाय कामाला सुरुवात करु नये.
II. प्रथमत: सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सक्षम अधिकाऱ्यांकडून अंदाजपत्रके साक्षांकित करुन घ्यावीत.
III. दुरूस्तीस विलंब किंवा इतर कारणांनी गोदाम दुरूस्तीस वाढीव खर्च होणार नाही, याबाबत दक्षता घ्यावी.

IV. अंदाजपत्रकातील दुरुस्ती कामाच्या आवश्यकतेबाबत जिल्हा पुरवठा अधिकारी, चंद्रपूर यांनी प्रथमत: खात्री करावी व तद्नंतरच काम हाती घ्यावे

**३. गोदाम दुरुस्ती पुढीलप्रमाणे :-**

| अ.क्र. | जिल्हा | तालुका | गोदामाचे नाव | कामाचे सर्वसाधारण स्वरुप | अंदाजित खर्च (रुपये) |
|---|---|---|---|---|---|
| १. | चंद्रपूर | वरोरा | शेगाव बु. शासकीय धान्य गोदाम | भिंतीची दुरुस्ती करणे इत्यादी. (अंदाजपत्रकाप्रमाणे) | १०,१४,१४६/- |
| | | | | **एकूण** | १०,१४,१४६/- |
| **एकुण रुपये- दहा लाख चौदा हजार एकशे शेहचाळीस फक्त.** | | | | | |

४. सदर कामाची सुरवात सन २०१८-१९ या आर्थिक वर्षापासून होत आहे.

५. प्रस्तावित कामांचे वर्षनिहाय खर्चाचे नियोजन पुढीलप्रमाणे राहील-

| आर्थिक वर्ष | अपेक्षित खर्च (रु.लक्ष) | सुरु असलेल्या इतर कामांसाठी आवश्यक तरतुद (रु.लक्ष) | एकूण मंजूर तरतूद (रु.लक्ष) |
|---|---|---|---|
| सन २०१८-१९ | ५.०७ | ३२० | ३८२ |
| सन २०१९-२० | ५.०७ | ३४० | ४१२.५६ |

६. सुरु असलेल्या कामांचा वित्तीय नियोजनाचा तपशील पुढीलप्रमाणे-

| अ.क्र. | कामाचे नाव | एकूण अपेक्षित खर्च (रु. लक्ष) | मागील वर्ष अखेर झालेला खर्च (रु. लक्ष) | चालू वर्षात अपेक्षित खर्च (रु. लक्ष) | पुढील वर्षासाठी carry forward करावयाची तरतूद (रु. लक्ष) |
|---|---|---|---|---|---|
| १. | शेगाव बु. शासकीय धान्य गोदाम ता.वरोरा जि. चंद्रपूर | १०.१४ | ० | ५.०७ | ५.०७ |

७. वरीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता प्राप्त झालेल्या शासकीय गोदाम दुरूस्तीकरीता निधी उपलब्ध झाल्यांनतर त्याप्रमाणे दुरूस्तीची कामे करण्यात यावी. निधी प्राप्त झाल्यानंतर शासकीय

गोदाम दुरूस्तीची कामे तातडीने सुरू करण्यात येऊन पूर्ण करण्यात यावीत. गोदाम दुरूस्ती सुरू झाल्यांनतर प्रथम दुरूस्तीचा संपूर्ण तपशिल तसेच संबंधित दुरूस्तीचा दरमहा आढावा घेऊन दुरूस्तीची प्रगती जिल्हा पुरवठा अधिकारी, चंद्रपूर यांनी शासनास सादर करावी.

८. सदरील गोदाम दुरूस्तीची कामे सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यात यावीत. त्याकरीता आवश्यक निधी सार्वजनिक बांधकाम विभागास उपलब्ध करून देण्यात येईल.

९. सदर जिल्हयातील वर नमूद गोदाम दुरूस्तीच्या कामास या अगोदर प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली नाही याची खातरजमा जिल्हा पुरवठा अधिकारी, चंद्रपूर यांनी करावी.

१०. सदरील शासकीय गोदाम दुरूस्तीची कामे पूर्ण होताच त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता जिल्हा पुरवठा अधिकारी, चंद्रपूर यांनी घ्यावी.

११. प्रशासकीय मान्यतेच्या आदेशात कामाचे संक्षिप्त स्वरूप नमूद करण्यात आलेले असून प्रत्यक्षात गोदाम दुरूस्तीची कामे शासनास सादर केलेल्या दुरूस्ती कामांच्या अंदाजपत्रकानुसारच पूर्ण करण्यात यावीत. म्हणजेच शासनास सादर केलेल्या अंदाजपत्रकात समाविष्ट बाबीनुसार गोदाम दुरूस्तीची कामे पूर्ण करण्यात यावीत.

१२. गोदाम दुरुस्तीच्या कामातील अनावश्यक पुनरुक्ती टाळण्याच्या दृष्टीने सदरहू आदेशात नमूद गोदाम दुरुस्तीच्या कामाच्या आवश्यकतेबाबत जिल्हा पुरवठा अधिकाऱ्यांनी व्यक्तिश:छाननी करावी. गोदाम दुरुस्तीच्या कामातील पुनरुक्ती अथवा विसंगतीबाबत शासनास अवगत करावे. यासंदर्भात पुढील शासन आदेशापर्यंत कार्यवाही स्थगित करावी.

१३. सदरील कामावरील खर्च सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात व तद्नंतर वेळोवेळी उपलब्ध अनुदानातुन करण्यात येईल. सदर गोदामाच्या दुरूस्तीवरील खर्च "मागणी क्रमांक एम-०२, लेखाशिर्ष २४०८ अन्न साठवण व वखार साठवण यावरील भांडवली खर्च , ०१, अन्न १०१, प्रापण व पुरवठा (०३), प्रापण वितरण व किंमत वितरण ०३, ०२ ( मुफसल ) २४०८ ०१०८ २७ लहान बांधकामे" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

१४. सदर गोदामाच्या दुरूस्तीचे काम पूर्ण झाल्यानंतर सदरचे काम हे मंजूर अंदाजपत्रकाप्रमाणे उत्कृष्ट झाल्याबाबतची खातरजमा संबंधीत कार्यकारी अंभियंता, सार्वजनिक

बांधकाम विभाग व जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी संयुक्तरित्या करून तसा स्थल निरिक्षण अहवाल तयार करावा व तो अभिलेखामध्ये जतन करून ठेवावा.

१५. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ च्या भाग पहिला उप विभाग-पाच मधील अनुक्रमांक १० नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ नुसार प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७१२१४५९२१८००६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil Deoman Baswant

Digitally signed by Sunil Deoman Baswant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=F.C.S and C.P. Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8883fe608dc825b4f80204357f8a6fadfe8507e0636b91f3c5fefef9c43acfe1, cn=Sunil Deoman Baswant
Date: 2018.07.12 15:02:20 +05'30'

**(सु.दे.बसवंत)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. उप आयुक्त (पुरवठा), नागपूर.
२. वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
३. जिल्हाधिकारी, चंद्रपूर.
४. जिल्हा पुरवठा अधिकारी, चंद्रपूर.
५. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, चंद्रपूर.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर
७. महालेखापाल (लेखा परीक्षा) १/२, मुंबई/नागपूर.
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, मुंबई/नागपूर.
९. वित्त विभाग (व्यय-४, अर्थोपाय व अर्थसंकल्प-३), मंत्रालय, मुंबई.
१०. नियोजन विभाग (का-१४११), मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती/नापु-१६ ब.